महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील महिला व बाल विकास आयुक्तालय कार्यालयातील सांख्यिकी अधिकारी ,गट-ब (राजपत्रित) या पदावर प्रतिनियुक्ती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्र. मबाआ-२०२४/प्र.क्र.२३/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २९ जून,२०२४.

**वाचा:-**

१) महिला व बाल विकास विभाग पत्र क्र.मबाआ-२०१५/प्र.क्र.७/का-७ अ, दि.९.४.२०२४
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का-१२, दि.१७.१२.२०१६,
३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का-१२, दि.२७.१२.२०१६ व दि.१६.२.२०१८
४) श्रीमती मोना विक्रम घाडगे, सांख्यिकी अधिकारी/संशोधन अधिकारी,पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे यांचा दि.१.२.२०२४ रोजीचा अर्ज,
५) नियोजन विभाग, मंत्रालय यांचे दि.४.६.२०२४ रोजीचे पत्र.

**शासन आदेश-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत गट-ब (राजपत्रित) या संवर्गात रिक्त पदांचे प्रमाण अधिक असल्याने सदर पदांपैकी सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याच्या अनुषंगाने इच्छुक असलेल्या अधिकाऱ्यांचा प्रस्ताव सादर करण्यास संदर्भाधीन क्र.१ येथिल पत्रान्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांना कळविण्यात आले होते. त्यानुसार श्रीमती मोना विक्रम घाडगे, सांख्यिकी अधिकारी/संशोधन अधिकारी,पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१६: ४४९००-१४२४००) यांनी केलेल्या विनंती नुसार त्यांची महिला व बाल विकास विभागांतर्गत आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या अधिनस्त सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती होण्याकरीता नियोजन विभाग, मंत्रालय यांच्या संदर्भ क्र.४ येथिल पत्रान्वये शिफारशीसह प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

२. त्यानुसार श्रीमती मोना विक्रम घाडगे, सांख्यिकी अधिकारी/संशोधन अधिकारी,पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे गट-ब (राजपत्रित) यांची महिला महिला व बाल विकास विभागांतर्गत आयुक्त, महिला व

बाल विकास, पुणे यांच्या अधिनस्त आयुक्तालयातील सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या पदावर प्रथमत: ३ वर्ष अथवा सदर पदावर विभागातील मुळ गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांची नियुक्ती होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंतच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

**३.** श्रीमती मोना विक्रम घाडगे यांची महिला महिला व बाल विकास विभागांतर्गत आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या अधिनस्त आयुक्तालयातील सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या पदावरील प्रतिनियुक्तीवरील सेवा खालील अटींच्या अधीन राहतील.

अ) उपरोक्त अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल. त्यानंतर प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर, त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी "मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे" अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

**४.** उपरोक्त अधिकाऱ्यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी नियोजन विभाग व महिला व बाल विकास विभाग यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

**५.** सदरची प्रतिनियुक्ती विनंतीनुसार असल्याने सदर अधिका-यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही. तसेच वेतन,भत्ते, रजा,प्रवास सवलत, वैद्यकीय सवलत, गटविमा योजना इ. सेवाविषयक बाबी संदर्भात त्यांना त्यांच्या मूळ सेवेचे नियम लागू असतील.

**६.** नियोजन विभागाने श्रीमत घाडगे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे तसेच आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी श्रीमती घाडगे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू करुन घेण्यासंदर्भातील पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

**७.** संबंधित अधिका-यांनी नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल आयुक्त, महिला व बाल विकास,पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

८. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२८१८१४१९२९३० असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHIVAJI P KARWAR

Digitally signed by SHIVAJI P KARWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=579FDC49AAE09A107A14D18D2E6E7AEC6E608DE79CB8407CA0E64638BB98CDB0, cn=SHIVAJI P KARWAR
Date: 2024.06.29 14:54:20 +05'30'

**(शिवाजी पां.कारवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
२. श्रीमती मोना विक्रम घाडगे, सांख्यिकी अधिकारी/संशोधन अधिकारी,पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे

**प्रत,**

१. मा.मंत्री (म.व बा.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२,
२. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
३. अ.मु.स., नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
४. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२ यांचे स्वीय सहायक,
५. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, पुणे,
६. सह /उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
८. निवडनस्ती (कार्यासन-७अ), महिला व बाल विकास विभाग.